आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (CMEGP) योजनेसाठी निधी वितरण
(लेखाशीर्ष २८५१ ६६५४)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/प्र.क्र.०९/का-६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ मार्च, २०२३.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.४.०४.२०२२, दि.०८.०३.२०२३ व दि.१६.३.२०२३.

२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.४/का-६, दि.०५.०९.२०२३

३) उद्योग विभागाची नस्ती क्र.मुरोनि-२०२२/प्र.क्र. १५७/उद्योग-७.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत ऊद्योग विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (CMEGP) या योजनेसाठी रु.१७०.०० लाख इतका निधी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील तरतुदींतून वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.३ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०२२-२३ अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग या मुख्य लेखाशिर्षांतर्गत मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (CMEGP) या योजनेसाठी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन रु.१७०.०० लाख इतका निधी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील तरतुदींतून खालीलप्रमाणे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु. लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२२-२३ साठी सुधारीत अंदाज | यापूर्वी वितरीत निधी | सदर शा. नि.द्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (CMEGP) | २८५१६६५४ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ७००.०० | २१०.०० | १७०.०० |
| | **एकूण** | | **७००.००** | **२१०.००** | **१७०.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.१७०.०० लाख (अक्षरी रुपये एक कोटी सत्तर लाख फक्त) इतका निधी** प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून अप्पर मुख्य सचिव, उद्योग विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२६४-२०२३/व्यय-१४, दि.१४.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१७१८०८०४२३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.03.28 18:31:13 +05'30'

**(राजेंद्र दे. भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/ नागपूर/ अमरावती.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
९. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.